# महाराष्ट्र शासन

**तात्काळ**

क्र. एएससी १५१९/प्र.क्र.२९/१४-अ,
सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई ४०० ०३२.
दूरध्वनी क्र. ०२२-२२७९४१७२
दिनांक : २८ जानेवारी, २०१९

प्रति,

सह/उप सचिव (आस्थापना),
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

विषय:- महाराष्ट्र राज्य मानवी हक्क आयोग, मुंबई या कार्यालयातील या विविध रिक्त पदे प्रतिनियुक्तीने भरण्याबाबत.

संदर्भ:- १) सा.प्र.वि. शा.नि. क्र.एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/का. १२, दिनांक १७-१२-२०१६
२) सा.प्र.वि., शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण २०१७/प्र.क्र.१२०/१४, दिनांक ३१.८.२०१७
३) महाराष्ट्र राज्य मानवी हक्क आयोग, मुंबई यांचे क्र.एसएचआरसी/प्रशा/०१/२०१९/८१, दिनांक १६-०१-२०१९ चे पत्र

महोदय/महोदया,

सा.प्र.वि. शा.नि. क्र.एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/का.१२, दिनांक १७-१२-२०१६ च्या शासन निर्णयान्वये प्रतिनियुक्तीचे धोरण निश्चित करण्यात आले असून, संदर्भ क्र.२ येथील दिनांक ३१-८-२०१७ च्या शासन निर्णयान्वये मंत्रालयीन संवर्गातील अधिकारी/कर्मचारी यांच्या प्रतिनियुक्तीबाबत कार्यपध्दती विहित करण्यात आली आहे. सदरहू कार्यपध्दतीस अनुसरुन महाराष्ट्र राज्य मानवी हक्क आयोग, मुंबई या कार्यालयातील निम्नश्रेणी लघुलेखक, सहायक व लिपिक-टंकलेखकाचे प्रत्येकी १ रिक्त पद मंत्रालयीन विभागातील निम्नश्रेणी लघुलेखक, सहायक कक्ष अधिकारी व लिपिक-टंकलेखक संवर्गातील कर्मचाऱ्यांकडून भरण्याबाबत संदर्भाधिन क्र. ३ येथील पत्रान्वये महाराष्ट्र राज्य मानवी हक्क आयोग, मुंबई यांनी विनंती केली आहे. त्यास अनुसरुन खालील तक्त्यातील स्तंभ क्र.४ येथील पदावर व स्तंभ क्र.५ येथील दिनांकापासून पुढे पदे प्रतिनियुक्तीने भरण्याकरीता इच्छुकता मागविण्यात येत आहे :-

| अ.क. | महाराष्ट्र राज्य मानवी हक्क आयोग, मुंबई कार्यालयातील पदनाम | वेतनश्रेणी | मंत्रालयीन संवर्गातील पदनाम | प्रतिनियुक्तीने नेमणूकीचा दिनांक |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | निम्नश्रेणी लघुलेखक | ९३००-३४८०० (ग्रे.वे.४३००/-) | निम्नश्रेणी लघुलेखक | ०१-०३-२०१९ पासून पुढे |
| २. | सहायक | ९३००-३४८०० (ग्रे.वे.४३००/-) | सहायक कक्ष अधिकारी | ०१-०६-२०१९ पासून पुढे |
| ३. | लिपिक-टंकलेखक | ५२००-२०२०० (ग्रे.वे.१९००/-) | लिपिक-टंकलेखक | ०१-०५-२०१९ पासून पुढे |

२. उपरोक्त पदावर प्रतिनियुक्तीने जाण्याकरिता इच्छुक मंत्रालयीन विभागातील निम्नश्रेणी लघुलेखक, सहायक कक्ष अधिकारी व लिपिक-टंकलेखक यांनी आपल्या मंत्रालयीन प्रशासकीय विभागाकडे अर्ज सादर करावा कोणत्याही परिस्थितीत या विभागाकडे थेट अर्ज करु नयेत तसेच प्रत देखील अंकीत करु नये . थेट प्राप्त झालेल्या अर्जावर कोणतीही कार्यवाही करण्यात येणार नाही.

३. सर्व संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी इच्छुक कर्मचाऱ्यांचे अर्ज प्राप्त झाल्यानंतर संदर्भाधिन शासन निर्णयातील तरतूदीनुसार अर्जांची छाननी करुन खालील माहितीसह आपल्या विभागाच्या सचिवांच्या मान्यतेने इच्छुक कर्मचाऱ्याचा प्रतिनियुक्तीचा प्रस्ताव खालील माहितीसह या कार्यासनाकडे दिनांक १५-०२-२०१९ पर्यंत पोहोचेल अशारीतीने (नोंदणी शाखेत पाठवू नये) पाठवावा:-

| | | |
|---|---|---|
| १) | कर्मचाऱ्याचे संपूर्ण नांव व पदनाम | |
| २) | जन्मदिनांक | |
| ३) | सेवानिवृत्तीचा दिनांक (पहा शा.नि.दिनांक १७-१२-२०१६ मधील तरतुद ५ (ब) (६) | |
| ४) | शैक्षणिक अर्हता | |
| ५) | भ्रमणध्वनी क्रमांक | |
| ६) | मागील ५ वर्षाच्या गोपनीय अहवालाच्या छायाप्रती (मूळ गोपनीय अहवाल पाठवू नयेत) | |
| ७) | मत्ता व दायित्व सादर केली आहेत का? (दि.३१.३.२०१८ रोजीचे) | |
| ८) | ५०/५५ व्या वर्षी पुनर्विलोकन केले आहे का? (लागू असल्यास) | |
| ९) | संबंधित कर्मचाऱ्याला यापूर्वी प्रतिनियुक्ती दिली असल्यास त्याबाबतचा तपशील (पद, ठिकाण व कालावधी) | |
| १०) | संबंधित कर्मचाऱ्याविरुध्द विभागीय चौकशी सुरु अथवा प्रस्तावित आहे काय? | |

४. एकदा निवड झालेल्या कर्मचाऱ्याला त्याचे नाव मागे घेता येणार नाही. तसेच, आपल्या विभागातून सदर पदावर प्रतिनियुक्तीसाठी जाण्यास कोणीही कर्मचारी इच्छुक नसल्यास तसेही कृपया दिनांक १५-०२-२०१९ पर्यंत या विभागास कळविण्यात यावे.

५. सद्य:स्थितीत शासनाने सरळसेवा भरतीवर निर्बंध घातले असल्याने, प्रतिनियुक्तीने रिक्त होणाऱ्या पदावर तत्काळ कर्मचारी उपलब्ध करुन देणे शक्य होणार नाही. तथापि, सरळसेवा व पदोन्नतीमधून ज्या प्रमाणात उमेदवार उपलब्ध होतील त्या प्रमाणात विभागातील रिक्त पदांच्या टक्केवारीनुसार विभागास निम्नश्रेणी

लघुलेखक, सहायक कक्ष अधिकारी व लिपिक-टंकलेखक संवर्गातील कर्मचारी उपलब्ध करुन देण्यात येतील याची विभागांनी नोंद घ्यावी.

६. सदर पत्राची प्रत महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवरील संदेशफलक या टॅबखाली प्रसिध्द करण्यात येत आहे.

७. सदर शासन पत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१९०१२८१६४३२५३६०७ असा आहे. हे पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

आपला,

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2019.01.28 16:52:45 +05'30'

**( ग.भि.गुरव )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) सहायक निबंधक, महाराष्ट्र राज्य मानवी हक्क आयोग, मुंबई
९, हजारीमल सोमानी मार्ग, छत्रपति शिवाजी महाराज टर्मिनस समोर, मुंबई-४००००१ यांनी यापुढे कोणताही पत्रव्यवहार मंत्रालयीन प्रशासकीय विभागामार्फत करणे आवश्यक आहे.

२) उप सचिव (पोल-१४) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२

३) सा.प्र.वि./१४-अ (संग्रहार्थ).